**सार्वत्रिक बदल्या:-**
**उप अधीक्षक, राज्य उत्पादन शुल्क (गट-ब).**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन आदेश क्रमांक:- इएसटी-१२१७/प्र.क्र.६३/राउशु-१,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक:- ३१ मे, २०१७.

**शासन आदेश :-**

उप अधीक्षक, राज्य उत्पादन शुल्क (गट-ब) या संवर्गातील खालील **स्तंभ (२)** मधील नमूद अधिकाऱ्यांनी त्यांच्या सध्याच्या पदावर तीन वर्षांचा कालावधी पूर्ण केला असल्यामुळे त्यांच्या नियत बदल्या करण्यात येत असून त्यांची पदस्थापना खालील **स्तंभ (४)** मध्ये दर्शविलेल्या पदावर करण्यात येत आहे.

| अ.क्र. | अधिकाऱ्याचे नाव | सध्याचे पद | नवीन पदस्थापना |
|---|---|---|---|
| **१** | **२** | **३** | **४** |
| १ | श्री. युवराज गो. राठोड | उप अधीक्षक, राउशु, मुंबई शहर-१ | **ठाणे (राउशु)** |
| २ | श्री. शशिकांत वि. गर्जे | उप अधीक्षक, राउशु, मुंबई शहर-२ | **मुंबई उपनगर-३** |
| ३ | श्री. प्रवीण सुनिलकुमार तांबे | उप अधीक्षक, राउशु, मुंबई उपनगर-१ | **उप अधीक्षक, हडपसर- पुणे.** |
| ४ | श्री. सुरजकुमार रामोड | उप अधीक्षक, राउशु, कल्याण, मुरबाड, ठाणे | **उप अधीक्षक, मे. बॉम्बे ब्रेवरीज, रायगड** |
| ५ | श्री. रविकिरण रघुनाथ कोले | उप अधीक्षक, राउशु, सोलापूर अधीक्षक कार्यालय | **उप अधीक्षक, कल्याण -मुरबाड** |
| ६ | श्रीमती स्नेहा सु. सराफ | उप अधीक्षक, मे. बॉम्बे ब्रेवरीज, रायगड | **उप अधीक्षक, मुंबई शहर-१** |
| ७ | श्री. विठ्ठल तु. भुकन | उप अधीक्षक, मे. रेडिको एन. व्ही. डिस्टिलरीज, औरंगाबाद | **उप अधीक्षक, मुंबई उपनगर-१** |
| ८ | श्री. गणेश व्ही. बारगाजे | उप अधीक्षक, मे. टिळकनगर आसवणी, जि. अहमदनगर | **उप अधीक्षक, नाशिक** |

२. महाराष्ट्र शासकीय कर्मचा-यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणा-या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ मधील तरतुदीनुसार सक्षम प्राधिकाऱ्यांच्या पूर्व मान्यतेने या बदल्या करण्यात येत आहेत.

३. हे आदेश तात्काळ अंमलात येतील. बदली झालेल्या अधिकाऱ्यांनी बदली नंतरच्या पदस्थापनेचा कार्यभार तात्काळ स्वीकारावा. बदली आदेशाची अंमलबजावणी तात्काळ व कार्यक्षमरित्या होण्याकरिता आयुक्त, राउशु यांनी खालील सूचनांचे काटेकोरपणे पालन करावे

अ) बदलीबाबतचे आदेश प्राप्त झाल्यानंतर बदली झालेल्या अधिकाऱ्यांना तात्काळ कार्यमुक्त करावे. बदली झालेले अधिकारी त्यांच्या सध्याच्या पदावरून कार्यमुक्त होऊन रूजू होण्यासाठी आल्यानंतर त्यांना विनाविलंब रूजू करून घ्यावे. सदर अधिकाऱ्याला रूजू करून न घेतल्यामुळे काम न देता सक्तीचा प्रतिक्षाकाळ ठरवून वेतन व भत्ते देण्याचा प्रसंग उद्भवल्यास संबंधीत अधिकाऱ्यांना जबाबदार धरण्यात येईल.

ब) संबंधित अधिकाऱ्यांना नवीन नियुक्तीच्या जागी हजर होण्यासाठी कोणत्या दिनांकास कार्यमुक्त केले आणि ते नवीन नियुक्तीच्या जागी कोणत्या दिनांकास हजर झाले याबाबत शासनास त्वरीत कळवावे.

४. बदलीच्या आदेशात बदल करून घेण्यासाठी कोणत्याही अधिकाऱ्याने प्रत्यक्ष वा अप्रत्यक्षपणे दबाव आणण्याचा प्रयत्न केल्यास, ही कृती महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक) नियम, १९७९ मधील नियम २३ चे उल्लंघन करणारी असल्यामुळे ती गैरवर्तणूक समजून संबंधित अधिकाऱ्यांविरुद्ध शिस्तभंगविषयक कारवाई करण्यात येईल.

५. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०१७०५३११७१५०२४२२९ असा आहे. हा शासन आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Dilip J Shedmekhe

Digitally signed by Dilip J Shedmekhe
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Section Officer, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=5c22eb48b36977859e2ada92f034598cc0bc8511f0527da968636a6b9d9e10f0, serialNumber=5603a72ffdb1ef7b928b7c0a641bd1c8ef4b36aa6a8fd21a86271888a24f9803, cn=Dilip J Shedmekhe
Date: 2017.05.31 17:20:19 +05'30'

**( दि. ज. शेडमेखे )**
कक्ष अधिकारी, गृह विभाग, महाराष्ट्र शासन

**प्रति:**

१. आयुक्त, राज्य उत्पादन शुल्क, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२. महालेखापाल-१/२ (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर,
३. सर्व विभागीय उपायुक्त, राज्य उत्पादन शुल्क (मार्फत आयुक्त, राज्य उत्पादन शुल्क, महाराष्ट्र राज्य, मुंबई.)
४. जिल्हा कोषागार अधिकारी, ठाणे/मुंबई/मुंबई उपनगर/औरंगाबाद/नाशिक/रायगड.
५. सर्व संबंधित अधीक्षक, राज्य उत्पादन शुल्क (मार्फत आयुक्त, राज्य उत्पादन शुल्क, महाराष्ट्र राज्य, मुंबई.)
६. संबंधित अधिकारी (मार्फत आयुक्त, राज्य उत्पादन शुल्क, महाराष्ट्र राज्य, मुंबई.)
७. निवडनस्ती (राउशु-१).